**राज्यातील अनुसूचित जमातीच्या व्यक्तींना घरकुल उपलब्ध करुन देण्यासाठी लागू करण्यात आलेल्या “शबरी आदिवासी घरकुल योजनेतंर्गत” ग्रामीण भागातील घरकुलांच्या किंमतीत वाढ करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक-घरकुल -२०१२/प्र.क.३८/(भाग-१)/का.१७.
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ७ ऑगस्ट, २०१४

**वाचा :-** १) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. घरकुल-२०१२/प्र.क्र.३८(भाग -१)/का.१७, दिनांक २८ मार्च, २०१३.

२) शासन निर्णय, ग्राम विकास विभा, क्रमांक-इंआयो-२०१३/प्र.क्र.२९६/योजना-१० दिनांक ७ नोव्हेंबर, २०१३.

**<u>प्रस्तावना :-</u>**

आदिवासी उपयोजनेतंर्गत राज्यातील अनुसूचित जमातीच्या व्यक्तींना घरकुल उपलब्ध करुन देण्यासाठी शबरी आदिवासी घरकुल योजना उक्त संदर्भ क्र. १ मध्ये नमूद केलेल्या दिनांक २८ मार्च, २०१३ च्या शासन निर्णयान्वये लागू करण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत ग्रामीण क्षेत्रासाठी रु. ७०,०००/-,नगरपालिका क्षेत्र रु. १,५०,०००/-, महानगरपालिका आणि मुंबई महानगर विकास प्राधिकरण क्षेत्र यासाठी रु. २,००,०००/- इतकी घराची किंमत मर्यादा निश्चित करण्यात आली आहे. सदर योजना ही ग्राम विकास विभागामार्फत राबविण्यात येत असलेल्या इंदिरा आवास योजनेच्या धर्तीवर राबविण्यात येत आहे. ग्राम विकास विभागाने इंदिरा आवास योजनेच्या किंमतीत उक्त संदर्भ क्र. २ मध्ये नमूद केलेल्या दिनांक ७ नोव्हेंबर, २०१३ च्या शासन निर्णयान्वये दिनांक १ एप्रिल २०१३ पासून रु. ७०,०००/- वरुन रु. १,००,०००/- इतकी वाढ केलेली आहे. त्याच धर्तीवर या विभागामार्फत राबविण्यात येत असलेल्या शबरी आदिवासी घरकुल योजनेतंर्गत केवळ ग्रामीण भागातील घरकुलाची किंमत रु. ७०,०००/- वरुन रु. १,००,०००/- इतकी करण्याचा तसेच सदरची योजना सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या रमाई घरकुल योजनेप्रमाणे जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणाव्दारे तसेच नगर परिषद व महानगरपालिका क्षेत्रात संबंधित नगर परिषद व महानगरपालिकांव्दारे राबविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

आदिवासी उपयोजनेतंर्गत राज्यातील अनुसूचित जमातीच्या व्यक्तींना घरकुल उपलब्ध करुन देण्यासाठी शबरी आदिवासी घरकुल योजना उक्त संदर्भ क्र. १ मध्ये नमूद केलेल्या दिनांक २८ मार्च, २०१३ च्या शासन निर्णयान्वये लागू करण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत घरांची किंमत मर्यादा ग्रामीण क्षेत्रासाठी रु. ७०,०००/- इतकी निश्चित करण्यात आली आहे. सदर योजना ही ग्राम विकास विभागामार्फत राबविण्यात येत असलेल्या इंदिरा आवास योजनेच्या धर्तीवर राबविण्यात येत आहे. ग्राम विकास विभागाने इंदिरा आवास योजनेच्या किंमतीत उक्त संदर्भ क्र. २ मध्ये नमूद केलेल्या दिनांक ७ नोव्हेंबर, २०१३ च्या शासन निर्णयान्वये दिनांक १ एप्रिल २०१३ पासून रु. ७०,०००/- वरुन रु. १,००,०००/- इतकी वाढ केलेली आहे. त्याच धर्तीवर आदिवासी विकास विभागामार्फत राबविण्यात येत असलेल्या शबरी आदिवासी घरकुल योजनेतंर्गत फक्त ग्रामीण भागातील घरकुलाची किंमत दि. १ एप्रिल,२०१३ पासून रु. ७०,०००/- वरुन रु. १,००,०००/- इतकी करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. तसेच सदरची योजना सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या रमाई घरकुल योजनेप्रमाणे जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणाव्दारे तसेच नगर परिषद व महानगरपालिका क्षेत्रात संबंधित नगर परिषद व महानगरपालिकांव्दारे राबविण्यासही शासन मान्यता देण्यात येत आहे.त्यानुसार संदर्भाधीन शासन निर्णय, दिनांक २८-३-२०१३ मध्ये वरील स्पष्टीकरण व टिपा समाविष्ट करण्यात येत आहेत.

३. संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक २८ मार्च, २०१३ मधील परिच्छेद ३ मधील लाभार्थ्यास शासनाच्या एकाच योजनेचा लाभ मिळाल्या नंतर “ कोणत्याही परिस्थितीत घरकुल योजनेतंर्गत लाभार्थ्यास एकाच योजनेचा लाभ देण्यात यावा” यापुढे पुढील स्पष्टीकरण समाविष्ट करण्यात यावे.

**स्पष्टीकरण :-** या विभागाने अनुसूचित जमातीच्या गृहनिर्माण संस्थांना जमीन खरेदी अनुदान आणि बांधकाम अनुदान किंवा यापैकी एक अदा केलेले असल्यास त्या अनुसूचित जमातीच्या गृहनिर्माण संस्थांमधील सभासदांपैकी ज्या सभासदाने या घरकुल योजनेसाठी अर्ज सादर केले असतील तर ते अर्ज अपात्र या संवर्गात जमा करण्यात यावे. तसेच अनुसूचित जमातीच्या गृहनिर्माण संस्थांमधील लाभ घेतलेल्या अशा अनुसूचित जमातीच्या सभासदांची यादी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांनी मुद्दा क्र. १४ मध्ये नमूद केलेल्या संबंधीत घरकुल निर्माण समितीस उपलब्ध करुन द्यावी.

४. संदर्भाधीन शासन निर्णय, दिनांक २८ मार्च,२०१३ मधील परिच्छेद ४ अ) ६ मधील कुटुंबाची वार्षिक उत्पन्न मर्यादा मधील ड) नंतर पुढील टिप समाविष्ट करण्यात यावी.

**टिप:-** कुटुंबाची वार्षिक उत्पन्न मर्यादा वरीलप्रमाणे जरी असली तरी प्रस्तुत घरकुल योजनेस अनुसरुन शासनाकडे प्राप्त झालेल्या अर्जामधील पात्र अर्जदारांपैकी ज्यांची नावे दारिद्रय रेषेखालील कुटुंबाच्या यादीमध्ये समाविष्ट आहेत त्या लाभार्थींना प्रथम टप्प्यात सर्वोच्च प्राधान्य देण्यात येईल व त्यानंतरच दारिद्रय रेषेवरील पात्र अर्जदारांना दुस-या टप्प्यात लाभ देण्यात येईल.

५. शासन निर्णय, दिनांक २८ मार्च,२०१३ मधील परिच्छेद ९ येथे प्राधान्य क्षेत्र या शिर्षातील "ई" च्या खालील टिप समाविष्ट करण्यात यावी.

**टिप :-** प्रस्तुत घरकुल योजनेस अनुसरुन शासनाकडे प्राप्त झालेल्या अर्जामधील पात्र अर्जदारांपैकी ज्यांची नावे दारिद्रय रेषेखालील कुटुंबांच्या यादीमध्ये समाविष्ट आहेत त्या लाभार्थींना प्रथम टप्प्यात सर्वोच्च प्राधान्य देण्यात येईल व त्यानंतरच दारिद्रय रेषेवरील पात्र अर्जदारांना दुस-या टप्प्यात लाभ देण्यात येईल.

६. शासन निर्णय, दि. २८ मार्च,२०१३ मधील परिच्छेद क्र. १८ मध्ये लॉटरी पध्दतीने, लाभार्थीची निवड करणे या ऐवजी पुढील परिच्छेद समाविष्ट करण्यात येत आहे.

**टिप :-** प्रस्तुत घरकुल योजनेस अनुसरुन शासनाकडे प्राप्त झालेल्या अर्जामधील पात्र अर्जदारांपैकी ज्यांची नावे दारिद्रय रेषेखालील कुटुंबांच्या यादीमध्ये समाविष्ट आहेत त्या लाभार्थींना प्रथम टप्प्यात सर्वोच्च प्राधान्य देण्यात येईल व त्यानंतरच दारिद्रय रेषेवरील पात्र अर्जदारांना दुस-या टप्प्यात लाभ देण्यात येईल. ग्रामीण भागाकरिता गावनिहाय, नगरपालिका व महानगरपालिका क्षेत्राकरिता वार्डनिहाय दारिद्रय रेषेखालील कुटुंबाची यादी विचारात घेण्यात यावी व त्यामध्ये दारिद्रय रेषेखालील कुटुंबाची संख्या चढत्या क्रमाने लावण्यात यावी. तदनंतर दारिद्रय रेषेखालील कुटुंबांची कमी संख्या असलेल्या गावे व वार्डामधील पात्र लाभार्थ्यांना या योजनेचा लाभ देण्यात यावा व त्यानंतर चढत्याक्रमाने आलेल्या गावे व वार्डामधील पात्र लाभार्थींना लाभ देण्यात यावा.

७. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. टी-५ मुख्य लेखाशिर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण राज्य योजनांतर्गत योजना (०२) (३३) शबरी आदिवासी घरकुल योजना (२२२५ डी २७१) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५५६/व्यय-१४, दिनांक ४/०८/२०१४ नुसार प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या WWW.Maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१४०८०७१८२३३१७८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SANJAY KASHINATH GAMBRE

Digitally signed by SANJAY KASHINATH GAMBRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SANJAY KASHINATH GAMBRE
Date: 2014.08.07 18:21:49 +05'30'

( सं. का.गंब्रे )

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४. मा. मंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
५. मा. राज्यमंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
६. सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
७. सर्व मा. विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य (संसदिय कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे मार्फत)
८. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. प्रधान सचिव ( ग्राम विकास), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. प्रधान सचिव, गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रादेशिक क्षेत्रविकास प्राधिकरण, बांद्रा कुर्ला संकुल, मुंबई
१४. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण बांद्रा (पूर्व) मुंबई

१५. सर्व मंत्रालयीन विभाग

१६. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) ( लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर

१७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

१८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

१९. सर्व विभागीय आयुक्त,

२०. सर्व जिल्हाधिकारी

२१. सर्व महानगरपालिका आयुक्त

२२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद

२३. आयुक्त, आदिवासी विकास, आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक

२४. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे

२५. संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे

२६. सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा

२७. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, अमरावती, नागपूर

२८. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प

२९. सर्व गट विकास अधिकारी, पंचायत समिती

३०. सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका/नगर परिषद

३१. अतिरिक्त संचालक, एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम कक्ष, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई

३२. वित्त विभाग (व्यय-१४/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई

३३. सर्व सह सचिव/उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

३४. सर्व कार्यासने, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय मुंबई

३५. निवड नस्ती कार्यासन १७.